**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,नाथनगर (उत्तर )पैठण, औरंगाबाद या प्रशिक्षण संस्थेमधील ३ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत..**
**(कालावधी दि.०१.०३.२०१५ ते दि.३१.०८.२०१५ पर्यंत)**

**महाराष्ट शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- मप्रप्र-२०१५/४९५/प्र.क्र.६६/१५/१२-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - २४ एप्रिल, २०१५

**वाचा :-** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक टिआरएन-२०११/प्रक्र.२८७//११/१२-अ दिनांक : १४ ऑक्टोबर, २०१३
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मप्रप्र-२०१३/५२३/प्र.क्र.८५/१३/१२-अ, दिनांक : १३ मार्च, २०१४.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मप्रप्र-२०१४/५९७/प्र.क्र.९८/१४/१२-अ, दिनांक : ८ जुलै, २०१४.
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१५/प्रक्र.५/१५/वित्तीय सुधारणा -१ दि. २०.२.२०१५.
५. निबंधक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेचे क्रमांक - मप्रविप्रप्र/ आस्था/मुदतवाढ/२०१५/१६४, दि.२४ मार्च, २०१५

**शासन निर्णय:**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, औरंगाबाद या संस्थेच्या आस्थापनेवरील संदर्भाधीन क्र. ३ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता संस्थेने संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये प्रस्तुत ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१५ ते दि.२८.०२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. राज्य प्रशिक्षण धोरण २०११, अन्वये संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये सहा संस्थाना विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आले आहे. या संस्थांमधील पदांचा आकृतिबंध एकसमान असणे आवश्यक असल्यामुळे संस्थेच्या पदांच्या आकृतिबंधाच्या प्रस्तावास दि. २८ जानेवारी, २०१५ च्या उच्चस्तर सचिव समितीच्या बैठकीमध्ये सर्व सवंर्ग मिळून एकूण २० पदांच्या आकृतिबंधास मान्यता प्राप्त झाली असून, त्याचे कार्यवृत्त मार्च २०१५ मध्ये प्राप्त झाले आहे. त्यानंतर या पदांचा शासन निर्णय निर्गमित करणे, त्याचबरोबर संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयामधील नमूद केलेल्या पदे भरण्याच्या कार्यपध्दतीनुसार सदर पदे प्रतिनियुक्तीने भरणे, या सर्व प्रक्रियेस २ ते ३ महिन्याचा कालावधी लागण्याची शक्यता आहे.

३. त्यामुळे याबाबत सर्व बाबींचा सर्वकष विचार करुन आता, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, औरंगाबाद औरंगाबाद या संस्थेच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या **एकूण ३ अस्थायी पदांना दि.१.३.२०१५ ते दि.३१.८.२०१५** पर्यंत सहा महिन्याच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदांची मुदतवाढ **दि.३१.८.२०१५** पर्यंत अथवा पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत राहील.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक प्राध्यापक | १ | रु. १५६००-३९००० + ग्रेड पे रु.५४००/- |
| २ | लिपिक-टंकलेखक | १ | रु. ५२००-२०२०० + ग्रेड पे रु.१९००/- |
| ३ | सामान्य परिचर | १ | रु. ४४४०-७४४० + ग्रेड पे रु.१३००/- |
| | **एकूण** | **३** | |

४. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.ए-४, **मुख्य लेखाशिर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा- (००३) प्रशिक्षण-(००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (योजनेतर) (२०७० ०७४६) ३६-सहाय्यक अनुदाने (वेतने) "** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो **सन सन २०१५-२०१६** या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा -१ दि. २०/२/२०१५. अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०४२४१६५००६११०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: CN = PATIL PRATIBHA MADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916982
Date: 2015.04.24 17:01:35 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ मुंबई .
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र २, नागपूर.
३) अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
५) विशेष कार्य अधिकारी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर),पैठण, औरंगाबाद.
६) उप संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, औरंगाबाद.
७) वरिष्ठ कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जिल्हा औरंगाबाद.
९) वित्त विभाग, कार्यासन -वित्तीय सुधारणा-१ व व्यय ४ मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवड नस्ती/कार्यासन १२-अ